राज्यातील शासन मान्यताप्राप्त खाजगी विनाअनुदानित व कायम विनाअनुदानित शिक्षण संस्थांमधील व्यावसायिक अभ्यास क्रमांसाठी प्रवेश घेणाऱ्या अनुसूचित जाती प्रवर्गातील विद्यार्थ्यांच्या शैक्षणिक शुल्क प्रतिपूर्ती योजना.

पालकाच्या उत्पन्न मर्यादेत सुधारणा करणे

**महाराष्ट्र शासन**

**सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग**

**शासन निर्णय क्रमांकः इबीसी २०१८/प्र.क्र.४००/शिक्षण-१**

मंत्रालय विस्तार भवन, मुंबई - ४०० ०३२

दिनांक : ०५ नोव्हेंबर, २०१८

वाचा -

१) शासन निर्णय, उच्च व तंत्रशिक्षण विभाग, क्र.टीईएम-२०१५/प्र.क्र.२१९/तांशि-४, दिनांक ३१ मार्च, २०१६

२) शासन निर्णय, सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग, क्र.इबीसी-२०१६/ प्र.क्र.२२१ /शिक्षण-१,दिनांक ३१ मार्च, २०१६

३) शासन निर्णय, सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग, क्रमांकः इबीसी-२०११/ प्र.क्र.४ /शिक्षण-१, दिनांक १८ सप्टेंबर, २०१८

**प्रस्तावना :**

अनुसूचित जाती प्रवर्गातील विद्यार्थ्यांना भारत सरकार मॅट्रीकोत्तर शिष्यवृत्ती योजनेंतर्गत सन २०१८-१९ पासून पालकांची उत्पन्न मर्यादा रुपये २.०० लाखावरुन रुपये २.५० लाखापर्यंत वाढ करण्यास दिनांक १८.०९.२०१८ च्या संदर्भीय शासन निर्णयान्वये मंजूरी देण्यात आली आहे. त्या अनुषंगाने अनुसूचित जाती प्रवर्गातील विद्यार्थ्यांसाठी व्यावसायिक अभ्यासक्रमांकरीता राज्य शासनामार्फत राबविण्यात येणाऱ्या शैक्षणिक शुल्क प्रतिपूर्ती योजनेंतर्गत पालकाची उत्पन्न मर्यादा सुधारीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधिन होती.

**शासन निर्णय** -

२. राज्यातील शासन मान्यताप्राप्त खाजगी विनाअनुदानित व कायम विनाअनुदानित शिक्षण संस्थांमध्ये संदर्भीय दिनांक ३१.०३.२०१६ च्या शासन निर्णयान्वये विहित केलेल्या व्यावसायिक अभ्यासक्रमासाठी सन २०१८-१९ पासून प्रवेश घेणाऱ्या अनुसूचित जाती प्रवर्गातील विद्यार्थ्यांच्या पालकाचे उत्पन्न रुपये २.५० लाखापेक्षा जास्त आहे, अशा अनुसूचित जाती प्रवर्गातील विद्यार्थ्यांना राज्य शासनाच्या शैक्षणिक शुल्क प्रतिपूर्ती योजनेंतर्गत लाभ मिळण्यास पात्र ठरविण्यास शासन मान्यता देण्यात येत आहे.

३. पुढील आदेश होईपर्यंत, अनुसूचित जाती प्रवर्गातील विद्यार्थ्यांकरीता मॅट्रीकोत्तर शैक्षणिक शुल्क प्रतिपूर्ती योजनेंतर्गत उर्वरीत अटी व शर्ती संदर्भीय दिनांक ३१ मार्च, २०१६ च्या शासन निर्णयाप्रमाणे राहतील.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेत स्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१८११०५१५०९३२९२२२ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Chandrakant haridas Wade

Digitally signed by Chandrakant haridas Wade
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Social Justic and S. A., postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=fda96a8ca4dd3ecbdbbe4b156e5eaa93f60f3e037cbbbbdefe9e2961f45f0960, cn=Chandrakant haridas Wade
Date: 2018.11.05 15:12:53 +05'30'

**( चंद्रकांत ह. वडे )**

**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१) मा.राज्यपालांचे सचिव, राजभवन, मलबार हिल, मुंबई
२) मा.मुख्यमंत्र्यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई
३) मा.मंत्री/मा.राज्यमंत्री (सा.न्या.व वि.स.वि.) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
४) मा.विरोधी पक्षनेता, विधानपरिषद/विधानसभा, विधानभवन, मुंबई
५) मा.विधान परिषद/विधानसभा सदस्य, विधानभवन, मुंबई
६) मा.मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई
७) अमुस, उच्च व तंत्र शिक्षण विभाग,मंत्रालय, मुंबई
८) प्रधान सचिव, माहिती व तंत्रज्ञान विभाग, मंत्रालय, मुंबई
९) प्रधान सचिव, अल्पसंख्याक विकास विभाग, मंत्रालय, मुंबई
१०) सचिव, विजाभज, इमाव व विमाप्र कल्याण विभाग, मंत्रालय, मुंबई
११) सचिव, आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई
१२) सचिव, वैद्यकीय शिक्षण व औषधी द्रव्ये विभाग, मंत्रालय, मुंबई
१३) सचिव, शालेय शिक्षण व क्रिडा विभाग, मंत्रालय, मुंबई
१४) सर्व प्रशासकीय विभाग, मंत्रालय, मुंबई
१५) महासंचालक, माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, मुंबई (प्रसिध्दीसाठी)
१६) आयुक्त,समाजकल्याण,महाराष्ट्र राज्य, पुणे.
१७) संचालक, शिक्षण, महाराष्ट्र राज्य, पुणे
१८) सर्व मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद
१९) सर्व प्रादेशिक उपायुक्त, समाज कल्याण,
२०) सर्व जिल्हा समाजकल्याण अधिकारी, जिल्हा परिषद
२१) महालेखापाल, (लेखा व अनुज्ञेय/लेखा परिक्षा) महाराष्ट्र ½,मुंबई/नागपूर.
२२) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
२३) सर्व जिल्हा कोषागार अधिकारी,
२४) सर्व सहायक आयुक्त,समाजकल्याण.
२५) निवडनस्ती.